वन विभागासाठी केंद्र शासनाकडुन कॅम्पातंर्गत प्राप्त झालेल्या निधीतून निर्लेखित वाहनांच्या बदली नविन वाहने खरेदी करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र.वाहन-२०१५/प्र.क्र.८०/फ-५**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १०.०४.२०१५.

**संदर्भ**-: १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन ) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष ८/भांडार/वाहन/नाशिक/प्र.क्र.७/ज - १३९१५-१४/, दि.२०.०३.२०१४.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :वाहन/२०१४ प्र.क्र/१४/३६.विनियम, मंत्रालय, मुंबई दिनांक २२.०८.२०१४.

३) शासन निर्णय महसुल वन विभाग क्र.वाहन २००१/प्र.क्र.१७२/फ-५ दि.१३.०५.२००९.

**प्रस्तावना :-**

वन खात्यातील वन उपजाची अवैधतोड व वाहतुक आणि चोरी गेलेला मुद्देमाल जप्त करणे , जप्त केलेला माल डेपोवर पोहचविणे व तसेच आरोपी पकडण्याकरिता चोरी गेलेल्या मालाचा व फरार आरोपींचा शोध घेण्याकरिता, तसेच वन उपजांचे संरक्षण करण्याकरिता मोठया अडचणी निर्माण होत असतात. या कामाकरिता अधिकारी व कर्मचारी यांना गस्त करण्यासाठी वाहनांची नितांत आवश्यकता आहे. वनक्षेत्रातील वनांची कामे बहुधा दुर्गम व अतिदुर्गम तसेच संवेदनशील भागात आहेत. या गोष्टींवर देखरेख ठेवून वनगुन्हा करणाऱ्या आरोपी / गुन्हेगांरावर वचक ठेवण्याकरिता व वनगुन्हे शोधून काढण्यास्तव वाहनाअभावी अडचणी निर्माण होतात. त्यामुळे कामाचा व वेळेचा खोळंबा निर्माण होतो. उच्च न्यायालयाने रिट याचिक क्रमांक १२७७/२००० मधील कृती आराखडयामधील वनसंरक्षणाची कामे परिणामकारक होण्याच्या दृष्टीने जुन्या निर्लेखित वाहना बदली नविन वाहन खरेदी करणे अत्यंत गरजेचे आहे.

शासन निर्णय दिनांक १३.०५.२००९ अन्वये वन विभागासाठी वाहन आढाव्या अंतर्गत एकुण ५१५ वाहने ( ७२ कार व ४४३ जीप) मंजुर करण्यात आली आहेत. याव्यतिरीक्त शासन निर्णय दि.१६.१०.२०१२ अन्वये वित्त विभागाच्या मान्यतेने वन विभागासाठी मंजूर केलेल्या वाहन आकृतीबंधा व्यतिरीक्त आणखी १०० जीप खरेदी करण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन ) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र १ . येथील पत्रान्वये नाशिक वनवृत्तातील ३ निर्लेखित वाहनांच्या बदली नविन वाहने खरेदीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे . सदरहू वाहन खरेदीचा खर्च केंद्र शासनाकडून कॅम्पातंर्गत

प्राप्त झालेल्या निधीतुन भागविण्यात येणार आहे. या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन ) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार मुख्य वन संरक्षक ,नाशिक यांच्या अधिपत्याखालील एकूण ३ निर्लेखित वाहनांच्या बदली नविन ३ वाहने खरेदी करण्यास खालील शर्ती व अटीचे अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. निर्लेखित करावयाच्या तीन वाहनांचा समावेश शासन निर्णय दिनांक १३.०५.२००९ अन्वये वन विभागासाठी मंजुर केलेल्या वाहन आकृती बंधामध्ये समावेश असावा.

२. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.

३. वाहन निर्लेखित झाल्यानंतर त्या वाहनाचा पुन्हा वापर करता येणार नाही.

४. वाहन चालकाचे पद मंजूर / उपलब्ध असणे आवश्यक आहे.कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकांची नवीन पदे निर्माण करण्यात येऊ नयेत.

५. शासकीय अधिकाऱ्यांच्या कर्तव्याच्या अनुषंगाने वाहने अनुज्ञेय करण्यात येते.वाहन अनुज्ञेय असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन (जीप/ कार) निर्लेखित करण्यात आले असेल,त्या वाहनाऐवजी संबंधित पदासाठी त्याच प्रकारचे वाहन (दि.८ मे,२०१४ व दि.४ ऑगस्ट,२०१४ च्या शासन निणर्यान्वये व दि.७ ऑगस्ट २०१४ च्या शुध्दीपत्रकान्वये अनुज्ञेय व यापुढे वेळोवेळी सुधारणा करण्यात येणाऱ्या शासन निर्णयातील अनुज्ञेय असलेल्या व यापुढे वेळोवेळी सुधारणा करण्यात येणाऱ्या शासन निर्णयातील अनुज्ञेय किंमत मर्यादेतील) खरेदी करता येतील.

**खरेदी करावयाचा नविन वाहनांचा तपशिल :-**

| अ.क्र. | वाहनाचा प्रकार | वाहनांची संख्या | वाहनाची किंमत | एकुण रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | जीप | ३ | रू ६.००.लक्ष | रू.१८ ००.लक्ष |
| **२** | **एकुण** | **३** | -- | **रू. १८.०० लक्ष** |

ज्या निर्लेखित वाहनांच्या बदली नविन वाहने खरेदी करावयाची आहेत त्याचा तपशिल (उदा .वाहनाचा प्रकार,वाहन क्रमांक,कार्यालयाचे नाव इ.) खालील प्रमाणे आहे.

| अ. क्र. | वनवृत्त | वन विभाग | वाहनाचा प्रकार | वाहन क्रमांक | निर्लेखित वाहनांचे आदेश क्र.व दि . |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नाशिक | अहमदनगर | जीप | एमएच-१६ एन १४८ | कक्ष-१३/लले/ ११६४/ १४-१५, दि.१.०७.२०१४ |
| २ | | पश्चिम नाशिक | जीप | एमएच-१५ अेअे ५०३६ | ब/शा.वाहने/३५४७/१४-१५ दि.२४.१२.२०१४ |
| ३ | | पश्चिम नाशिक | जीप | एमएच-१५ अेअे ५०३६ | कक्ष-१/संकीण/वाहने /१४१९ /१४-१५, दि.६.०१.२०१५ |

सदर प्रस्तावावरील रू.१८.०० लक्ष इतका खर्च केंद्र शासनाकडून कॅम्पातंर्गत प्राप्त झालेल्या निधीतुन भागविण्यात यावा .

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३४/१५/ विनिमय/ दि.३१.०३.२०१५ यांच्या सहतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१०१२३०५५८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.04.10 12:42:01 +05'30'

( डॉ.यु.एम.फारूकी )

सह सचिव (वने)

महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख )महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन ) महाराष्ट्र राज्य, नागपूर .

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कॅम्पा) महाराष्ट्र राज्य,नागपुर.

५) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नाशिक.

६) उपमुख्य वन सरंक्षक (पश्चिम नाशिक) जि.नाशिक.

७) उपमुख्य वन सरंक्षक (अहमदनगर) जि.नाशिक.

८) महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपुर

९) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपुर

१०) कार्यासन, व्यय-१०/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) कार्यासन फ-५, निवड नस्ती